**अल्पसंख्याक विकास विभागामार्फत सुरु करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहात राहणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या (मुले/मुली) आहाराकरिता थेट रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याबाबत....**

---

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : वआयो २०१७/प्र.क्र.३१/१७/का-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०२१.

वाचा : अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक :
अविवि २००९/प्र.क्र.१५/का.८, दिनांक ०२ मार्च, २०१०.

**प्रस्तावना –**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील (मुस्लिम, जैन, बौध्द, ख्रिश्चन, शीख, ज्यु व पारशी) उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी (मुले/मुली) शासकीय वसतिगृह योजना राबविण्यात येते. अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना मुख्य प्रवाहात आणणे व त्यांना उच्च शिक्षण देणे सोयीचे व्हावे हा या योजनेचा मूळ उद्देश आहे.

२. सद्य:स्थितीत विविध कल्याणकारी योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानाऐवजी त्याकरिता रोख स्वरुपात थेट निधी लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याचे धोरण शासनाने स्विकारले आहे.

३. राज्यातील उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या वसतिगृहात प्रवेश घेण्यास इच्छुक असलेल्या विद्यार्थ्यांची आर्थिक परिस्थिती अत्यंत गरीब असते. त्यामुळे भोजनासाठी होणारा खर्च करण्यास ते असमर्थता दर्शवितात. बऱ्याच वेळा त्यांचा भोजनावर होणारा खर्च हा त्यांना त्यांच्या घरापासून शैक्षणिक संस्थेत जाण्यासाठी होणाऱ्या प्रवास खर्चापेक्षाही जास्त असतो. त्यामुळे विद्यार्थी वसतिगृहामध्ये प्रवेश घेण्यास फारसे उत्सुक नसतात. परिणामी सदर वसतिगृहांमध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी राखीव असलेल्या ७०% जागा संपूर्णपणे अल्पसंख्याक प्रवर्गातील विद्यार्थ्यांकडून भरल्या जात नाहीत. त्यामुळे अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना मुख्य प्रवाहात आणण्याचा शासनाचा उद्देश पुर्णत: सफल होत नसल्याचे आढळून आले आहे.

४. उपरोक्त बाबी विचारात घेऊन अल्पसंख्याक विकास विभागामार्फत सुरु करण्यात आलेल्या वसतिगृहात प्रवेशित अल्पसंख्याक समाजाच्या विद्यार्थ्यांच्या (मुले/मुली) आहारासाठीची रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

यानुसार मंत्रीमंडळाने दिनांक ०४.०७.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

## शासन निर्णय -

अल्पसंख्याक विकास विभागांतर्गत राज्यातील ‘अ’, ‘ब’, ‘क’ व ‘ड’ महानगरपालिका, विभागीय शहरे तसेच जिल्हास्तरीय व तालुकास्तरावर बांधण्यात आलेल्या सर्व वसतिगृहात प्रवेशित अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना (मुले/मुली) त्यांचा आहार त्यांच्या सोयीचे ठिकाणी व त्यांच्या आवडीनुसार उपलब्ध करुन घेण्याकरिता आर्थिक सहाय्य म्हणून थेट रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याबाबत या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना सन २०२१-२२ या वर्षापासून राबविण्यात यावी.

२. सदर आहार भत्ता योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्यांची (मुले/मुली) पात्रता खालीलप्रमाणे आहे :

१) विद्यार्थी हा अल्पसंख्याक समाजातील असावा तसेच महाराष्ट्र राज्याचा अधिवासी (Domocile) असावा.

२) विद्यार्थ्याच्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रु.८.०० लाखाच्या आत असावे.

३) विद्यार्थी अल्पसंख्याक समाजासाठी बांधण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहामध्ये प्रवेशित असावा.

४) विद्यार्थ्यांने राष्ट्रीयकृत बँकेत खाते उघडले आहे त्या बँक खात्याशी विद्यार्थ्यांचा आधार क्रमांक संलग्न करणे आवश्यक असेल, सदर बँक खाते चालू स्थितीतील असणे आवश्यक असेल व त्याची जबाबदारी संबंधित विद्यार्थ्याची असेल.

५) लाभार्थी विद्यार्थी इयत्ता १२ वी नंतरचे उच्च शिक्षण घेणारा असावा.

६) विद्यार्थ्यांची शैक्षणिक संस्थेमधील / महाविद्यालयातील उपस्थिती समाधानकारक असणे आवश्यक राहील. याबाबतची खातरजमा प्राचार्यांनी वेळोवेळी करावी.

७) विद्यार्थ्यांने सदर योजनेचा लाभ घेतल्यानंतर त्याचे नाव महाविद्यालयातून कमी केल्यास / त्याने महाविद्यालय सोडल्यास / त्याने वसतिगृह सोडल्यास त्याला अनुज्ञेय नसलेल्या कालावधीसाठी अदा करण्यात आलेल्या रक्कमेची वसुली करण्याची जबाबदारी संबंधित शासकीय वसतिगृहाच्या प्राचार्यांची राहील. ज्या शैक्षणिक संस्थेत विद्यार्थी प्रवेशित असेल त्या शैक्षणिक संस्थेच्या प्राचार्यांच्या सहयोगाने सदर कार्यवाही करावी.

८) सदर योजनेसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांने पूर्णवेळ शासन मान्य अभ्यासक्रमात प्रवेश घेणे आवश्यक आहे. लाभार्थी विद्यार्थी शिकत असलेला संबंधित अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंतच भोजन भत्ता योजनेच्या लाभास पात्र राहील. लाभार्थ्यांने प्रत्येक वर्षी त्या त्या अभ्यासक्रमाच्या परिक्षेत उत्तीर्ण / अंशत उत्तीर्ण होणे (ए.टी.के.टी.) अनिवार्य राहील.

९) लाभार्थी विद्यार्थ्याने निवड केलेल्या शैक्षणिक अभ्यासक्रमाच्या कालावधीपर्यंत (उदा.अभियांत्रिकी अभ्यासक्रम ४ वर्षे कालावधीचा असल्यास ४ वर्षेच) उक्त योजनेचा लाभ घेता येईल. त्यानंतर त्या विद्यार्थ्यास सदर योजनेचा लाभ मिळणार नाही.

१०) सदर योजनेतील पात्र विद्यार्थी पूर्ण अनुत्तीर्ण झाल्यास, त्याला सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात येणार नाही.

११) लाभार्थी विद्यार्थी कोणत्याही प्रकारची पूर्णकालीन नोकरी किंवा व्यवसाय करीत नसावा.

१२) या योजनेसाठी खास बाब सवलत लागू राहणार नाही.

३. शासकीय वसतिगृहात प्रवेशित अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या आहाराकरिता पुढीलप्रमाणे देय रक्कम संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना प्राप्त झाल्यावर त्यांचे स्तरावरुन वसतिगृहातील

अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात सदर रक्कम ७ दिवसांचे आत जमा करण्यात यावी :

| अ.क्र. | वसतिगृह स्तर / दर्जा | मासिक रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | अ, ब व क वर्ग महानगरपालिका, विभागीय शहरातील वसतिगृहे | रु.३,५००/- |
| २. | जिल्हास्तरावरील व तालुकास्तरावरील सर्व वसतिगृहे | रु.३,०००/- |

४. **आहार भत्ता योजने करिता अनुदान वितरणाची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहिल** :

१) आहार भत्ता योजनेचा लाभ घेण्याकरीता शासकीय वसतिगृहातील प्रत्येक पात्र व इच्छुक अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांमार्फत विहीत नमुन्यात अर्ज (प्रपत्र-अ) संबंधित वसतिगृहाशी संलग्न असलेल्या शिक्षणसंस्थेच्या प्राचार्यांकडे वसतिगृहाच्या वॉर्डनमार्फत सादर करण्यात येईल.

२) सदर अर्जासोबत विद्यार्थ्याने त्यांचा आधार क्रमांक देणे आवश्यक असेल तसेच ज्या बँक खात्यात विद्यार्थ्याला भोजन भत्त्याची रक्कम प्राप्त करुन घ्यावयाची आहे, असे खाते राष्ट्रीयकृत बँकेत असावे. विद्यार्थ्याचे बँक खाते आधार क्रमांकाशी संलग्न असल्याची तसेच सदर बँक खाते चालू स्थितीत असण्याची जबाबदारी संबंधित विद्यार्थ्याची राहिल.

३) अर्जाची तपासणी केल्यानंतर योजनेच्या अटी व शर्तीची पुर्तता करीत असलेल्या अल्पसंख्याक विद्यार्थ्याची सदर योजनेच्या लाभासाठी संबंधित शासकीय वसतिगृहाचे प्राचार्यांमार्फत निवड करण्यात येईल. योग्य लाभार्थ्यांची निवड करण्याची जबाबदारी संबंधित प्राचार्यांची राहिल.

४) अर्जाची विहीत पध्दतीने विहीत प्राधिकारी यांचेमार्फत रितसर छाननी झाल्यानंतर दोन आठवड्यात पात्र लाभार्थी विद्यार्थ्यांची अंतिम यादी संबंधित वसतिगृहाच्या प्राचार्याकडून जिल्हयाचे जिल्हाधिकारी तसेच शासनास उपलब्ध करुन देण्यात येईल. पात्र लाभार्थी विद्यार्थ्यांची यादी प्राप्त झाल्यानंतर एक आठवड्यात जिल्हाधिकारी यांच्याकडून लाभार्थी संख्येच्या प्रमाणात आहार भत्त्यासाठी शासनाकडे पहिल्या पाच महिन्यांसाठी (पहिल्या टप्प्यात) निधीची मागणी करण्यात येईल.

५) प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर शासनाकडून जिल्हाधिकाऱ्यांना पहिल्या टप्प्यातील निधी वितरीत करण्यात येईल.

७) आहार भत्त्याच्या दुसऱ्या टप्प्याच्या निधी मागणीचा प्रस्ताव जिल्हाधिकारी / शासन यांचेकडे सादर करण्यापूर्वी संबंधित वसतिगृहातील प्राचार्य यांचेकडून संबंधित विद्यार्थी शिक्षण घेत असलेल्या शैक्षणिक संस्थेमधील त्याच्या उपस्थितीची खातरजमा करण्यात येईल.

८) पहिल्या टप्प्यातील निधी वाटपाच्या तपशीलासह व उपयोगिता प्रमाणपत्रासह दुसऱ्या टप्प्यातील निधी मागणीचा प्रस्ताव जिल्ह्याधिकाऱ्यांमार्फत शासनास सादर

केला जाईल. जिल्हाधिकाऱ्यांकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर शासनाकडून जिल्हाधिकाऱ्यांना दुसऱ्या टप्प्यातील निधी वितरीत करण्यात येईल.

९) सदरचा निधी जूलै ते नोव्हेंबर (पहिला टप्पा) व माहे डिसेंबर ते एप्रिल (दुसरा टप्पा) या पाच पाच महिन्यांच्या कालावधीसाठी दोन टप्प्यात वितरीत करण्यात येईल.

१०) आहार भत्ता योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत सदर योजनेचा निधी आहारीत करुन जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करण्यात येईल.

११) त्यानंतर कार्यालयीन कामकाजाच्या ७ दिवसांमध्ये संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांचेमार्फत आहार भत्त्याची रक्कम संबंधित अल्पसंख्याक विद्यार्थ्याच्या बँक खात्यात थेट वितरीत करण्यात येईल व त्याची यादी संबंधित प्राचार्यांना व शासनास पाठविण्यात येईल.

५. शासकीय वसतिगृहातील पात्र अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात आहाराची रक्कम जमा करण्याचे वेळापत्रक खालीलप्रमाणे राहिल :

| **हप्ता** | **कालावधी** | **रक्कम जमा करण्याचा कालावधी** |
|---|---|---|
| पहिला | माहे जूलै ते नोव्हेंबर | ज्या दिवशी विद्यार्थ्याचा वसतिगृहामध्ये प्रवेश निश्चित होईल त्यानंतर एक महिन्यात |
| दुसरा | माहे डिसेंबर ते एप्रिल | माहे डिसेंबर चा तिसरा आठवडा |

६. उपरोक्त योजनेंतर्गत शासकीय वसतिगृहातील केवळ अधिकृत अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना आहार भत्त्याची रक्कम वितरीत करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी कार्यालयातील संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. सदर योजनेंतर्गत वितरित करण्यात आलेली आहार भत्याची रक्कम तसेच लाभार्थींची संख्या इत्यादीचा तपशील संगणकीकृत पध्दतीने ठेवण्यात येईल आणि आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून आहार भत्ता लाभार्थ्यांना वितरीत केल्याचा अहवाल संबंधित प्राचार्यांना तसेच शासनास सादर करण्यात येईल.

७. उपरोक्त योजनेंतर्गत येणारा खर्च -मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००-इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०८) शहरातील अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या वसतिगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधुन अथवा वित्त विभागाच्या सहमतीने नवीन लेखाशीर्ष उघडून त्यामधुन भागविण्यात यावा.

८. सदर योजनेमध्ये व त्याच्या अंमलबजावणी मध्ये कोणतीही पूर्व सूचना न देता बदल अथवा सुधारणा करण्याचे अधिकार शासनास रहातील.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५९/२०२१/१४७१ दिनांक २८.०७.२०२१ आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४१/२०२१/व्यय-१, दिनांक ०८.०९.२०२१ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३१२३३५८७७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.10.13 12:37:30 +05'30'

**(दि.मा.सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालाचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्यांक विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र शासन
५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
७. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. प्राचार्य / अधिक्षक / वॉर्डन, अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह,
११. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव / घनसावंगी, जालना / शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल / शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर / राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर / शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद / शासकीय विदर्भ ज्ञान-विज्ञान संस्था, अमरावती / डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद / स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ, नांदेड / शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर / पूर्णा, परभणी / परभणी, जिल्हा परभणी / गंगाखेड, जिल्हा परभणी / हिंगोली, जिल्हा हिंगोली / वसमत, जिल्हा हिंगोली / वाशिम / सेलू, जिल्हा परभणी / पाथरी, जिल्हा परभणी / जिंतूर, जिल्हा परभणी / गांधी हायस्कुल, भंडारा / शासकीय तंत्रनिकेतन, यवतमाळ
१२. वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४, व्यय-१), मंत्रालय, मुंबई
१३. नियोजन विभाग (कार्या. १४७१)
१४. अवर सचिव, कार्यासन ७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (का-८)

**शासन निर्णय क्रमांक : वआयो २०१७/प्र.क्र.३१/१७/का-८, दिनांक १२ ऑक्टोबर २०२१ सोबतचे प्रपत्र**

# प्रपत्र 'अ'

## आहार भत्ता योजनेंतर्गत अर्जाचा नमुना

## वसतिगृहाचे नांव व पत्ता

विद्यार्थ्यांचा सध्याचा फोटो

**वैयक्तिक माहिती**

१. **अर्जदाराचे संपूर्ण नांव :** ------------------------------------------------------------

२. **लिंग :** पुरुष ☐ स्त्री ☐

३. **जन्मदिनांक :** -------------------------------------

४. **अल्पसंख्याक प्रवर्ग :** -----------------------------------------------

५. **सध्याचा पत्ता :** ----------------------------------------------------------------------------------

६. **जन्माचे ठिकाण :** ----------------------------------------------------------------------------

७. **तुम्ही महाराष्ट्राचे अधिवासी आहात का ? :** **होय** ☐ **नाही** ☐

८. **दूरध्वनी / मोबाईल क्रमांक :** ----------------------------------------------------------------

९. **ई-मेल :** -------------------------------------------------------------

१०. **आधार क्रमांक :** ------------------------------------------------------

**शैक्षणिक माहिती**

११. **शिक्षण घेत असलेल्या अभ्यासक्रमाचे नांव व कालावधी :** ----------------------------------------

१२. **शैक्षणिक संस्थेचे नांव, पत्ता व दुरध्वनी क्रमांक :** ---------------------------------------------

**बँकेचा तपशील**

१३. **बँक खाते क्रमांक :** -----------------------------------------------------------

१४. **बँकेचे नांव व शाखा व पत्ता :** --------------------------------------------------------------------

१५. **बँकेचा IFC कोड :** ----------------------------------------------------------------------

१६. **बँक खाते आधार कार्डशी संलग्न आहे काय ?** --------------------

## उमेदवाराचे प्रतिज्ञापत्र

मी ---------------------------------------- प्रतिज्ञापूर्वक असे जाहिर करतो / करते की, अर्जात दिलेली संपूर्ण माहिती खरी व बरोबर आहे. आहार भत्ता योजनेच्या कोणत्याही टप्प्यावर जर मी दिलेली माहिती खोटी अथवा चुकीची आढळली तर मला आहार भत्ता योजनेचा लाभ अनुज्ञेय रहाणार नाही व आहार भत्ता योजनेंतर्गत माझ्यावर झालेला संपूर्ण खर्च वसूलपात्र राहिल.

दिनांक : अर्जदाराची सही

ठिकाण :